**कृष्णा खो-याचा वार्षिक पाणी वापर निश्चित करण्याचे दृष्टीने स्थायी समन्वय व सनियंत्रण समिती.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१९/५४४/(प्र.क्र. १६०/२०१९)/जसंनि**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दि. ०७ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

कर्नाटक, आंध्रप्रदेश व महाराष्ट्र राज्यामध्ये उद्भवलेल्या विवादांचे निराकरण करण्यासाठी आंतरराज्य नदी पाणी तंटा अधिनियम (ISRW Act १९५६) १९५६ मधील तरतूदी अन्वये केंद्र शासनामार्फत न्या.बच्छावत यांच्या अध्यक्षतेखाली १९६९ मध्ये पहिला पाणी वाटप लवाद गठीत करण्यात आला. अधिनियमातील कलम ५(२) व कलम ५(३) अन्वये दाखल याचिकांची सुनावणी होऊन सन १९७६ ला अंतिम निर्णय जाहीर करुन, अधिसूचित करणेत आला व सदर निर्णय तीनही राज्यांना बंधनकारक झाला.

कृष्णा पाणी तंटा लवाद-१ ने खो-यात असलेल्या एकूण २१३० अघफू पाण्याचे ७५ % विश्वासार्हतेने काही बंधने घालून वाटप केले. त्यानुसार महाराष्ट्रास ५८५ अघफू, कर्नाटक राज्यास ७३४ अघफू व आंध्र प्रदेशास ८११ अघफू पाणी मिळाले.

तसेच, सन २००४ मध्ये कृष्णा नदी पाणी वापरावरुन उद्भलेल्या विवादांचे निराकरण करणेसाठी दुसरा पाणी तंटा लवाद न्या.ब्रिजेशकुमार यांचे अध्यक्षतेखाली गठीत झाला. तीनही राज्यांच्या मागण्या, साक्षीपुरावे व युक्तीवाद ऐकून अधिनियमातील कलम ५ (२) अन्वये दि. ३०/१२/२०१० रोजी आणि अधिनियमातील कलम ५ (३) अन्वये दि. २९/११/२०१३ रोजी अहवाल व अंतिम निर्णय जाहीर केला. सदर निर्णयावर सर्वोच्च न्यायालयात कर्नाटक, आंध्र प्रदेश व तेलंगणा राज्यातर्फे दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका व रिट याचिकांच्या सुनावण्या चालू आहेत.

त्यामुळे सदर निर्णयानुसार सन २००८-०९ ते २०१८-१९ या कालावधीतील पाणी वापराची माहिती तीनही राज्यांना अंमलबजावणी मंडळ गठित झाल्यानंतर त्या मंडळापुढे सादर करावी लागणार आहे. सदर माहिती ही प्रमाणिकरण व दृढिकरण करुन अत्यंत अचूक व निसंदिग्ध सादर होणे आवश्यक आहे. कृष्णा पाणी तंटा लवाद १ व २ या लवादांनी निश्चित केलेल्या तरतूदीनुसार पुढील कार्यवाही करण्याच्या दृष्टिने खालीलप्रमाणे **"स्थायी सनियंत्रण समन्वय समिती "** गठित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

१. कृष्णा पाणी तंटा लवादास आणि अंमलबजावणी मंडळास प्रत्यक्ष सादर करावी लागणारी सर्व प्रकारची माहिती ही अत्यंत अचूक व निसंदिग्ध सादर होणे राज्यांच्या हिताच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. सदरील माहिती महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या स्तरावरुन प्रमाणित होणे आवश्यक असून क्षेत्रिय कार्यालयाकडून प्राप्त होणारी माहिती प्रमाणित व दृढीकरण

करुन कृष्णा खोऱ्याचा वार्षिक पाणी वापर निश्चित करण्याचे दृष्टीने “स्थायी समन्वय व सनियंत्रण समिती ” ची स्थापना करण्यात येत आहे. सदर समितीची **रचना** पुढीलप्रमाणे आहे -

| | |
|---|---|
| **अध्यक्ष** | मुख्य अभियंता (ज. सं.), पुणे. |
| **सहअध्यक्ष** | मुख्य अभियंता (वि.प्र.), पुणे. |
| **सदस्य** | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे. |
| | अधीक्षक अभियंता,पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे. |
| | अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,सातारा. |
| | अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली. |
| | अधीक्षक अभियंता, सोलापूर पाटबंधारे मंडळ, सोलापूर. |
| | अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर. |
| | अधीक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा. |
| | अधीक्षक अभियंता, कुकडी पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे. |
| | अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद. |
| | अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बीड. |
| | अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री संकलन, नियोजन व जलविज्ञान मंडळ, नाशिक |
| | अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री पृथ:करण मंडळ, नाशिक. |
| **सदस्य सचिव** | अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे. |

**२. समितीची कार्यकक्षा : -**

१) कृष्णा खो-यातील पूर्ण आणि बांधकामाधीन असलेल्या मोठे,मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्प तसेच उपसा सिंचन योजनांचा प्रत्यक्ष पाणीवापर विहित नमून्यातील प्रपत्र १ ते ९ नुसार अंतिम करणे. यासाठी दर ६ महिन्यांनी (१५ ऑक्टोंबर व १५ जून आणि आवश्यकतेनुसार ) आढावा बैठक घेणे.

२) कृष्णा पाणी तंटा लवाद क्र. १ यांनी दिलेले निर्णय/आदेश व निर्देश यांची प्रत्यक्ष अंमलबजावणीबाबत आढावा घेणे.

३) कृष्णा पाणी तंटा लवाद कक्ष व कृष्णा खोरे विकास महामंडळा दरम्यान माहिती देवाण घेवाणीमध्ये समन्वय राखणे.

४) प्रकल्पांचा वार्षिक प्रत्यक्ष पाणीवापर अंतिम करुन मा. कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे विकास महामंडळास शिफारशीसह सादर करणे.

५) केंद्रीय जलआयोग व महाराष्ट्र राज्य यांच्या अखत्यारीतील सरिता मापन केंद्राव्दारे संकलित करण्यात आलेल्या माहितीच्या आधारे कृष्णा नदीमधून कर्नाटक राज्यामध्ये दरवर्षी वाहून गेलेल्या पाण्याचे परिमाण निश्चित करणे.

६) कृष्णा खोऱ्यातील सर्व मोठ्या प्रकल्पांचे Rules Curves व १० Daily Working Tables अंमलबजावणी मंडळ व संबंधित राज्यांना सादर करावे लागणार आहेत. सदर Rules Curves व १० Daily Working Tables समितीच्या बैठकीमध्ये चर्चा करुन अंतिम करणे.

७) कृष्णा खोऱ्यातील ठोक ५८५ (अ.घ. फू.) पाणी वापरास लवादाने परवानगी दिली आहे. या मर्यादेत इष्टतम वापर होईल यासाठी समितीच्या बैठकीमध्ये नियोजन करणे.

**३. इतर बाबी :-**

स्थायी सनियंत्रण समन्वय समितीच्या कामकाजाच्या अनुषंगाने आवश्यक सर्व व्यवस्था अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे यांनी करावयाची आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००१०८१४५१०२९४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajnish
Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2020.01.08 14:41:26 +05'30'

**(र. रा. शुक्ला)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत -**

१. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे ११.
२. मुख्य अभियंता (ज.सं.), पुणे.
३. मुख्य अभियंता (वि.प्र.), पुणे.
४. अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे.
५. अधीक्षक अभियंता,पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे.
६. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,सातारा.
७. अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली.
८. अधीक्षक अभियंता, सोलापूर पाटबंधारे मंडळ, सोलापूर.
९. अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर.
१०. अधीक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा.
११. अधीक्षक अभियंता, कुकडी पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे.
१२. अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद.
१३. अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बीड .
१४. अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे.
१५. अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री संकलन, नियोजन व जलविज्ञान मंडळ, नाशिक.
१६. अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री पृथ:करण मंडळ, नाशिक